**महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ व वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राबविल्या जाणाऱ्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजनेची कर्ज मर्यादा रु.१० लाखावरून रु.१५ लाखांपर्यंत वाढविण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक महामं-२०२४/प्र.क्र.१०२/महामंडळे**
मोतीमहल इमारत, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक :- १४ मे, २०२५

**वाचा:-** शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक : इमाव २०१९/प.क्र.११/ महामंडळे, दिनांक २८ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ व वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राज्यातील इतर मागास वर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी तसेच, त्यांना स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन नमूद शासन निर्णयान्वये रू. १० लाखापर्यंतची वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना राबविण्यात येत आहे. तथापि, सध्याच्या परिस्थितीत लघू व मध्यम उद्योगांकरिता लागणाऱ्या भांडवली व पायाभूत गुंतवणुकीमध्ये झालेली वाढ, कच्च्या मालाच्या किंमतींमध्ये झालेली दरवाढ व सतत होणारी महागाई निर्देशांकातील वाढ इ. बाबी विचारात घेता सदर योजनेची कर्ज मर्यादा अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या योजनेच्या समकक्ष करण्याबाबत सतत मागणी होत आहे. त्यानुसार, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ व वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राबविल्या जाणाऱ्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजनेची कर्ज मर्यादा रु.१० लाखांवरून रु.१५ लाखांपर्यंत वाढविण्यास मा. मंत्रिमंडळाने दिनांक २९/०४/२०२५ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता दिलेली आहे. वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजनेची कर्ज मर्यादा रु.१० लाखांवरून रु.१५ लाखांपर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांमार्फत तसेच या महामंडळांतर्गत स्थापित उपकंपन्यांमार्फत राबविल्या जाणाऱ्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजनेची कर्ज मर्यादा रु.१० लाखांवरून रु.१५ लाखांपर्यंत वाढविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या अटी/शर्ती वाचा येथील शासन निर्णय, दिनांक २८/०१/२०१९ मध्ये विहित केल्याप्रमाणेच कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५१४१८१३४१०७६०३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.05.14 18:14:25 +05'30'

**( साहिल म. धनवडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती / अध्यक्ष, विधान परिषद / विधानसभा, विधानमंडळ, मुंबई / नागपूर.
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (इतर मागास बहूजन कल्याण) यांचे खासगी सचिव.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, विधानमंडळ, मुंबई/ नागपूर.
७. सर्व सन्माननीय विधानसभा/ विधान परिषद सदस्य.
८. अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्या.) मुंबई.
११. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्या.) मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व /लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२. मुंबई/नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई, ठाणे.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
१७. वित्त विभाग (कार्यासन व्यय १४ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-३ / साउ), मंत्रालय, मुंबई.
१८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. निवडनस्ती/महामंडळे.